नगर विकास विभागाच्या आस्थापनेवरील नगर रचनाकार (गट-अ/राजपत्रित) संवर्गातील अधिकाऱ्यांच्या मध्यावधी बदल्या/ प्रतिनियुक्ती बाबत...

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन आदेश क्रमांक : प्रतिनि-१२२०/प्र.क्र.११८/२०२०/नवि-२७,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
चौथा मजला, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ०२ सप्टेंबर, २०२०.

**शासन आदेश :-**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील कलम ४ (४) (दोन) व कलम ४ (५) मधील तरतुदींनुसार तसेच महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेतर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळातील प्रदाने) नियम, १९८१ मधील परिशिष्ट-तीन, नियम ४० (१) (२) (३) (४) व परिशिष्ट-दोन मधील अटी व शर्तीनुसार प्रशासकीय कारणास्तव खालील विवरणपत्रात दर्शविण्यात आल्यानुसार नगर विकास विभागाच्या आस्थापनेवरील **नगर रचनाकार (वेतनश्रेणी : (एस-२०) ५६१००-१७७५००)** या संवर्गातील अधिकाऱ्यांची ठाणे महानगरपालिकेतील Cluster Cell करीता खालीलप्रमाणे मध्यावधी बदली / प्रतिनियुक्तीने पदस्थापना करण्यात येत आहे.

| अ. क्र. | अधिकाऱ्याचे नांव | सध्या कार्यरत असलेल्या कार्यालयाचे नाव | बदली/प्रतिनियुक्ती नंतरचे कार्यालय |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | श्री. पु .म. शिंदे | संचालक, नगर रचना, महाराष्ट्र राज्य, पुणे | ठाणे महानगरपालिका, ठाणे (प्र.नि.) |
| २ | श्रीमती दिपाली बसाखेत्रे | सहायक संचालक, नगर रचना, औरंगाबाद शाखा | ठाणे महानगरपालिका, ठाणे (प्र.नि.) |

०२. उपरोक्त अधिकारी यांची पदस्थापना प्रतिनियुक्तीने करण्यात येत असल्याने, त्यांना प्रतिनियुक्तीच्या विहित अटी व शर्ती लागू राहतील.

०३. उपरोक्त अधिकारी ज्या कार्यालयात कार्यरत आहेत, त्या कार्यालय प्रमुखांनी हे आदेश प्राप्त होताच वरील अधिकाऱ्यांना बदलीने/प्रतिनियुक्तीने पदस्थापना करण्यात आलेल्या ठिकाणी रुजू होण्याकरिता तात्काळ कार्यमुक्त करावे.

०४. या आदेशान्वये प्रतिनियुक्तीने पदस्थापना करण्यात आलेल्या अधिकाऱ्यांनी बदली/प्रतिनियुक्ती झालेल्या ठिकाणी तातडीने रुजू व्हावे व संबंधित अधिकारी बदली/प्रतिनियुक्ती झालेल्या पदावर रुजू झाल्याचा अहवाल संबंधित कार्यालय / संचालक, नगर रचना, पुणे यांनी nitin.shelke@nic.in या ई-मेल पत्त्यावर तात्काळ सादर करावा.

**०५.** सदरहू आदेशान्वये बदली/प्रतिनियुक्तीने पदस्थापना करण्यात आलेल्या अधिकाऱ्यांनी नियुक्तीच्या ठिकाणी हजर न झाल्यास वा राजकीय दबाव आणून बदली रद्द करण्याचा प्रयत्न केल्यास त्याची संबंधित अधिकाऱ्यांच्या गोपनीय अहवालात नोंद घेण्यात येईल. तसेच राजकीय दबावाबाबतची कृती महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम, १९७९ मधील नियम ३ (३) व २३ चे उल्लंघन करणारी असल्यामुळे ती गैरवर्तणूक समजून संबंधितांविरुध्द शिस्तभंगविषयक कारवाई करण्यात येईल, याची नोंद घेण्यात यावी.

०६. सदर शासन आदेश, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेताक २०२००९०२१२४००१४९२५ असा आहे. हा शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Digitally signed by VIJAY KARBHARI CHAUDHARI
Date: 2020.09.02 14:35:07 +05'30'

**( विजय चौधरी )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

संबंधित अधिकारी यांना,

**प्रत :-**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई.
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर.
३. महालेखापाल (लेखा परीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई.
४. महालेखापाल (लेखा परीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर.
५. मा.मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. मा.मंत्री (नगर विकास) महोदयांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
७. मा.राज्यमंत्री (नगर विकास) महोदयांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
८. प्रधान सचिव (नवि-१), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. प्रधान सचिव (नवि-२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. विभागीय आयुक्त, कोकण विभाग, नवी मुंबई.
११. विभागीय आयुक्त, औरंगाबाद विभाग, औरंगाबाद.
१२. आयुक्त, ठाणे महानगरपालिका, ठाणे.
१३. जिल्हाधिकारी, ठाणे/पुणे/औरंगाबाद.
१४. संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे-४११ ००१. (३-प्रती)
१५. सह संचालक, नगर रचना, औरंगाबाद विभाग, औरंगाबाद.
१६. सहायक संचालक, नगर रचना, औरंगाबाद शाखा, औरंगाबाद.
१७. जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे/ पुणे/औरंगाबाद.
१८. निवडनस्ती/नवि-२७.

***